जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून (कृष्णा नदीतून) घरगुती (पिण्याचे पाणी) प्रयोजनासाठीच्या सुजल निर्मल योजना/महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान योजनेअंतर्गत कुरुंदवाड नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर येथील सुधारीत नळ पाणी योजनेसाठी वाढीव पाणी आरक्षण पाणी परवाना मिळण्याबाबतचा प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बिसिंआ २०१४/(३७३ /१४)/सिं.व्य.(धो)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

तारीख: ११ /९/२०१४

<u>वाचा —</u>

1) **शासन निर्णय क्रमांकः** जलसंपदा विभाग, संकीर्ण १००१/ (१५४/०१/ ) सिंव्य(धोरण) दिनांक २१ जानेवारी २००३.
2) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ यात सुधारणा करण्याकरिता अधिनियम दि.२२ एप्रिल,२०११.
3) **शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१३/(४६०/१३)/सिंव्य (धोरण) दि. २८/८/२०१४.**

<u>प्रस्तावना —</u>

१.० शासनाच्या पूर्वीच्या धोरणानुसार, पिण्याच्या पाण्यासहित सर्व प्रकारच्या बिगरसिंचन प्रयोजनासाठी उदा. उद्योग, औष्णिक विद्युत प्रकल्प, अन्य सिंचनेतर संस्था इ., यांना पाणीआरक्षण द्यावयाचे जे प्रस्ताव जलसंपदा विभागाकडे प्राप्त होतात, त्यातील पाण्याचे आरक्षण हे जलसंपदा विभागाच्या प्रकल्पांच्या जलाशयातील उपलब्ध पाणीसाठयाच्या १५ टक्क्यांपेक्षा कमी असल्यास, त्यास संबंधित मुख्य अभियंता तसेच हे प्रमाण १५ टक्के ते २५ टक्के असे असल्यास, त्यास मंत्रालयीन आंतर विभागीय सचिवस्तरीय समितीकडून मान्यता देण्यात येत होती. त्याचप्रमाणे हे प्रमाण २५ टक्क्यांपेक्षा जास्त असल्यास, त्यास मा. मंत्रीमंडळाची उपसमिती असलेल्या, मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांच्या अध्यक्षतेखालील मा. मंत्री उच्चाधिकार समितीकडून मान्यता देण्यात येत होती.

२.० महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६(क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रीय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद करण्यात आली आहे. परंतु दि. २८.८.२०१४ रोजी च्या शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून जिल्हापरिषदा, नगरपरिषदा, नगरपालिका, नगरपंचायती, ग्रामपंचायती, आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांनी पिण्यासाठी पाणी मागणी केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांबाबतचे बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्ताव मा.मंत्री मंडळासमोर मान्यतेस्तव सादर करण्याऐवजी त्यास मा. मंत्री जलसंपदा विभाग यांच्या स्तरावरूनच मान्यता देण्यात यावी. तथापि, महानगरपालीका, विशेष नगर विकास प्रकल्प (Special Township Project) व औद्योगिक प्रयोजनासाठी बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावांना मा. मंत्रीमंडळाची मान्यता आवश्यक राहिल.

सुजल निर्मल योजना / महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान योजने अंतर्गत कुरुंदवाड नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर येथील सुधारीत नळ पाणी योजनेसाठी वाढीव एकूण १.०१४१ दलघमी पाणी मागणी केली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ च्या अनुषंगाने कुरुंदवाड नगरपरिषद पाणी पुरवठा योजनेसाठी कृष्णा नदी प्रकल्पातून १.०१४१ दलघमी पाणी आरक्षण प्रस्तावास मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय—**

३.० खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मधील नमुद संस्थेला त्यांचे नावासमोर रकाना क्र.५ मध्ये नमूद पाणी आरक्षणास, परिच्छेद ४.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पाणी आरक्षणाची मागणी करणाऱ्या संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार ( घरगुती) | जलाशय/ कालवा/ नदीचे नांव | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सुजल निर्मल योजना/महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान योजनेअंतर्गत कुरुंदवाड नगर परिषद, जिल्हा कोल्हापूर येथील सुधारीत नळ पाणी योजनेसाठी वाढीव पाणी आरक्षण प्रस्ताव | घरगुती | कृष्णा नदी प्रकल्पातून | १.०१४१ |

४.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे.

१) संस्थेने पाणी मोजमाप करण्याचे दृष्टीने जलमापन यंत्र (Water Meter) बसविणे आवश्यक आहे. घरगुती पाणी वापराकरीता शासनाच्या प्रचलित दराने आगाऊ पाणीपट्टी वसूल करावी.

२) संस्थेने आपत्कालीन परिस्थितीत स्वत:ची पर्यायी व्यवस्था करावी. उद्भव ठिकाणी पाण्याअभावी किंवा आपत्कालीन परिस्थितीत संस्थेस पाण्याची गरज भागविण्यासाठी ६० दिवस पाणी पुरेल इतक्या क्षमतेचा साठवण तलाव स्वखर्चाने बांधावा. तसेच या कालावधीत पाणी उपलब्ध नसल्यास जलसंपदा विभागाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही.

३) बहुतेक पाणी पुरवठा योजना सुरु करण्यास आरंभ काळ ( Gestation Period ) लागतो. सर्वसाधारणपणे या कालावधीत संस्था करारनामा करण्यास टाळते अथवा संस्थेसोबत बिगरसिंचन करारनामा केला असला तरीही शासनास कोणतीही पाणीपट्टी प्राप्त होत नाही. तथापि संस्थेने पाणी आरक्षण केलेले असल्यामुळे त्यांच्याकडून पाणीवापर होत नसूनही ते इतर अर्जदारांना सुद्धा देणे शक्य होत नाही. यामुळे शासनास मोठ्या महसुलास मुकावे लागते, ही बाब विचारात घेता, अशा पाणी आरक्षण प्रस्तवास मान्यता देतांना, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांनी महाराष्ट्र राज्यासाठी ठोक पाणी प्रशुल्क निकष, भाग ३ मधील परिच्छेद १३.४ (पाच) मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल.

जलसंपदा विभागाशी करारनामा करतांना बिगर सिंचन पाणी वापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्प्याने पाणी वापर करण्याचे नियोजन नमूद करु शकतील. अंतिम पाणी मागणी प्रमाणे पुरवठा सुरु होईपर्यंत वर्षनिहाय खालीलप्रमाणे आकारणी करण्यात येईल.

अ) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या प्रमाणात पाणीवापर असल्यास लागू दराने आकारणी.

ब) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या पाणीवापरापेक्षा + १०% पाणी वापर(अधिक/कमी) झाल्यास, फरकाच्या वापरास दंडणीय दर लागू दराच्या १.५ पट.

क)उर्वरित प्रमाणाकरिता म्हणजे अंतिम नियोजित पाणी वापर वजा टप्प्यानुसार नियोजित पाणी वापराकरिता, बांधिलकी/लेखबध्द आकार लागू दराच्या ५ टक्के वार्षिक दराने आकारण्यात येईल

४) जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव-२०१३/(प्र.क्र.४६६/२०१३)/सिंव्य (महसूल) दि. १२/११/२०१३ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५) सांडपाण्यामुळे जलस्त्रोताचे अथवा नद्यांचे प्रदुषण होणार नाही याची संबंधित संस्थानी दक्षता घ्यावी.

६) संस्थेस प्रथम पाणी वापर करण्यास परवानगीचे इरादापत्र (लेटर ऑफ इंटेन्ट) देण्यात यावे व करारनामा करण्याकरीता ३ महिन्यांची मुदत ठेवावी. करारनामा झाल्यानंतरच प्रत्यक्ष पाणी

परवाना दिल्याचे ग्राह्य मानण्यात येईल. संस्थेने सदर करारनामा विहित मुदतीत (३ महिन्यांच्या आत) न केल्यास संस्थेचे पाणी आरक्षण आपोआप रद्द होईल.

(७) सदर आरक्षणाच्या अनुषंगाने आवश्यक माहिती ई-जलसेवेच्या संबंधीत Module मध्ये भरण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११३५९३९२९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Kisan Sonawane

Digitally signed by Shrikant Kisan Sonawane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Kisan Sonawane
Date: 2014.09.11 13:55:02 +05'30'

**( श्री.कि.सोनावणे )**

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. विराधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विराधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
११ मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे

२०. मुख्य अभियंता, (जसं) जलसंपदा विभाग पुणे.

२१. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ पुणे.

२२. निवडनस्ती कार्यासन सिंव्यधोरण.

******************************